# नीम, एक अर्धा मुलगा

इदरीस



हिच-हिचच्या राणीने ज्ञानी आरिफच्या निर्देशांचे पालन नीट केले नाही. त्यामुळे तिला एक अर्धा मुलाला जन्म दिला. ही गोष्ट एका अर्ध्या मुलाची, नीमची आहे. ही कहाणी अफगाणिस्तान, सेन्ट्रल आशिया, आणि मिडल इस्टचे मुले अनेक वर्षांपासून ऐकत आली आहेत.

इदरिस शाह यांनी मोठ्या सुंदर पद्धतीने ही गोष्ट लिहिली आहे.



एके काळची गोष्ट आहे, जेव्हा माश्या उलट्या उडत होत्या आणि सूर्य थंड होता, तेव्हा कुठेतरी एक देश होता. त्या देशाचे नाव होते हिच-हिच. ज्याचा अर्थ आहे, “काहीही नाही.”



त्या राणीला एकही मुल नव्हते म्हणून मुलाच्या रूपाने एक छोटा मुलगा मिळवण्याची इच्छा होती.

“मी एक छोटा मुलगा कसा मिळवू शकते?” तिने राजाला विचारले. “मला खरच माहित नाही,” राजा म्हणाला.

तेव्हा राणीने इतर लोकांना विचारले आणि ते म्हणाले, “आम्हांला माफ करा, महाराणी, पण आम्ही सांगू शकत नाही की आपण लहान मुलगा कसा मिळवू शकता,” (ते लोक त्यांना महाराणीच म्हणत कारण राणीला असेच म्हटले जाई.)



मग राणीने परींना विचारले, आणि ती म्हणाली, आपण ज्ञानी आरिफ कडे जाऊन विचारू शकतो." ज्ञानी पुरुष आरिफ खूप बुद्धिमान होता आणि अनेक गोष्टींची त्यांना माहिती आहे. पऱ्या ज्ञानी आरिफ जिथे राहत होते तिथे गेल्या आणि त्यांना त्यांनी विचारले, 'आम्ही हिच-हिच देशाच्या पऱ्या आहोत. त्या देशाची एक राणी आहे आणि तिला छोटा मुलगा हवा आहे. पण राणीला माहित नाही तिला तो मुलगा कसा मिळेल?"

"मी तुम्हांला सांगेल की राणीला मुलाच्या रुपात एक छोटा मुलगा कसा मिळू शकेल?" ज्ञानी पुरुषाने हसून सांगितले.

आणि त्यांनी एक सफरचंद उचललं आणि पऱ्यांना दिलं. आणि म्हटलं, “हे सफरचंद राणीला द्या आणि तिला हे खायला सांगा. हे जर तिने पूर्ण खाल्ले तर ती एका छोट्या मुलाला जन्म देईन.” पऱ्यानी सफरचंद घेतले आणि ते घेऊन त्या राणीकडे गेल्या.

“महाराणी, आम्ही ज्ञानी पुरुष, आरिफला भेटायला गेलो होतो. ते सगळं जाणतात,” पऱ्यानी राणीला सांगितले. “त्यांनी सांगितले की हे सफरचंद पूर्ण खायला पाहिजे. जर तुम्ही ते खाल्ले तर तुम्ही एका छोट्या मुलाला जन्म देवू शकाल.”





राणी खूप प्रसन्न झाली.ती सफरचंद खायला लागली. पण पूर्ण सफरचंद खाण्याच्या आधी ते पूर्ण खायचे आहे हे ती विसरून गेली. ते पूर्ण खाणे किती आवश्यक होते. ती इतर अनेक गोष्टींबद्दल विचार करू लागली आणि अर्धे सफरचंद तिने तिथेच टाकून दिले.

तिने नक्कीच एका छोट्या मुलाला जन्म दिला. पण चुकून अर्धे सफरचंद खाल्ले होते, त्यामुळे तिला अर्धा मुलगा झाला होता. त्याला एक डोळा, एक कान, एक हात, आणि एक पाय होता. जिथे जिथे तो जाईल तिथे तो उड्या मारत जात असे. राणी त्या राजकुमाराला नीम अशी हाक मारत असे. कारण त्या देशाच्या भाषेत नीम या शब्दाचा अर्थ 'अर्धा' असा होता.



मोठा झाल्यावर राजकुमार नीम सगळीकडे एक घोड्यावर जात असे. तो सरळपणे घोड्यावर स्वार होत असे. कारण त्याला घोड्यावर उडी मारावी लागत नसे. घोडेस्वारी मध्ये तो खूप माहिर होता आणि मोठा झाल्यावर तो प्रत्येक क्षेत्रात एक चतुर मुलगा झाला.



पण लवकरच तो आपल्या अर्धेपणाला कंटाळला. आणि तो म्हणू लागला, “मला पूर्ण मुलगा व्हायचे आहे, मी पूर्ण मुलगा कसा होईल?” आणि राणी म्हणायची, “मला नाही माहित, खरच.” आणि राजा म्हणायचा, “मला तर अजिबातच माहित नाही.”



जेव्हा पऱ्यानी त्याचे बोलणे ऐकले, “आपण कदाचित ज्ञानी पुरुषाला जावू विचारायला हवं की राजकुमार नीम पूर्ण मुलगा कसा होवू शकतो. ज्ञानी सगळं जाणतात.” तर पऱ्या उडत तिथे गेल्या जिथे ज्ञानी पुरुष आरिफ राहत होते. त्यांनी विचारले, “आम्ही त्याच पऱ्या आहोत, ज्या हिच-हिचच्या राणीसाठी आपल्याकडे आलो होतो. जेव्हा राणीला मुलगा हवा होता. पण तिला एक अर्धा मुलगा झाला आहे आणि आता त्याला पूर्ण मुलगा व्हायचे आहे. तुम्ही मदत करू शकाल का?”





ज्ञानी पुरुष आरिफने एक निःश्वास टाकला आणि म्हटले, “राणीने अर्धे सफरचंद खाल्ले होते. म्हणून तिने अशा अर्ध्या मुलाला जन्म दिला. पण खूप वेळ निघून गेला आहे आणि आता राणी अर्धे सफरचंद खाऊ शकत नाही. आता ते खराब झाले असेल.”

“अर्धा मुलगा नीमला सांगा की आग ओकणाऱ्या ड्रगन टनीनकडे जा. ड्रगन एका गुहेत राहतो आणि सगळ्यांवर तो आग ओकून त्रास देतो. टनीनच्या गुंफेत त्या अर्ध्या मुलाला एक अनोखे औषध मिळेल.”

जर त्याने ते औषध प्यायले तर तो पूर्ण मुलगा होईल. जा त्याला हे सांगा,” ज्ञानी पुरुष आरिफ म्हणाला.

बास, पऱ्या उडत गेल्या आणि महालात जिथे राजा, राणी आणि त्यांच्या बरोबर त्यांचा मुलगा नीम राहत होता, तिथे पोहचेपर्यंत न थांबता उडत राहिल्या.

.



तिथे येवून त्यांनी राजकुमार नीमला सांगितले, “आम्ही ज्ञानी पुरुष, आरिफला भेटायला गेलो होतो. ते खूप चतुर आहेत आणि त्यांना सगळं समजते. त्यांनी सांगितले की, तुम्हाला टनीन ड्रगनला त्याच्या गुहे बाहेर काढावं लागेल. त्याने लोकांना खूप त्रास दिला आहे. त्याच्या गुहेत तुम्हाला ते अनोखे औषध मिळेल, ज्यामुळे तुम्ही पूर्ण मुलगा व्हाल.”

राजकुमार नीमने पऱ्यांचे आभार मानले आणि तो आपल्या घोड्यावर स्वार होवून त्या गुहेकडे गेला, जिथे टनीन ड्रगन आपल्या आसपास आग ओकत होता.

“ए ड्रगन, मी तुला इथून पळवून लावेन,” राजकुमार नीम जोरात ओरडला.

“पण तू असं का करशील?” टनीनने विचारले.

यावर राजकुमार नीम म्हणाला, “तू सगळ्यांवर आग ओकत असतो, आणि लोकांना ते आवडत नाही, म्हणून मी तुला इथून पळवून लावेन.”



“मला आग ओकावी लागते कारण मला अन्न शिजवावे लागते. जर अन्न शिजवण्यासाठी माझ्याकडे चूल असती तर मी आग ओकली नसती,” टनीन नाराज होवून म्हणाला.

“अन्न शिजवण्यासाठी मी तुला चूल देवू शकतो. पण तरीही तुला या गुहेतून बाहेर जावे लागेल,” राजकुमार म्हणाला..

तर ड्रगन म्हणाला, “मी आग ओकणे बंद केले तरी तू असं का करतो?”

“तुला या गुहेतून बाहेर यासाठी पडावे लागेल, कारण त्या गुहेत एक अनोखे औषध आहे. जर ते औषध मी प्यायले तर मी पूर्ण मुलगा होई शकतो. आणि खरच मला पूर्ण मुलगा व्हायचे आहे,” नीम म्हणाला.

“मी ते औषध तुला देईन, म्हणजे ते औषध मिळवण्यासाठी तुला मला गुहेतून बाहेर काढावं लागणार नाही. आणि ते औषध पिवून तू पूर्ण मुलगा होशील. मग आता तू जावून माझ्यासाठी चूल घेवून ये. मी त्या चुलीवर माझे अन्न शिजवेन. म्हणजे मला लोकांवर आग ओकावी लागणार नाही,” ड्रगन म्हणाला.



लगेचच ड्रगन गुहेत औषध आणायला गेला, आणि नीम बाहेर वाट बघू लागला. लगेचच टनीन अनोखे औषध घेवून गुहेच्या बाहेर आला. राजकुमार नीमने सर्व औषध प्यायले.



आणि हे सांगायला जितका वेळ लागेल त्यापेक्षाही कमी वेळात त्याला दुसरीकडे एक हात निर्माण झाला. त्याचा एक खांदा, एक कान, आणि बाकी सगळे त्याला निर्माण झाले.



तो एक पूर्ण मुलगा झाला होता.
आणि खूप खूप प्रसन्न होता.!



तो आपल्या घोड्यावर स्वार होवून पटकन हिच-हिच मध्ये असणाऱ्या आपल्या महालात आला. तिथे त्याने चूल मागवली आणि ती टनीनला दिली.

त्यादिवसापासून टनीन ड्रगन शांतीने आपल्या गुहेत राहू लागला. मग त्याने कधी कोणावर आग ओकली नाही. त्यामुळे लोक प्रसन्न झाले.



आता अर्ध्या मुलगा नीमला सर्वजण कुल्ल म्हणू लागले. हिच-हिच मध्ये त्याचा अर्थ, “पूर्ण मुलगा”. त्याला अर्धा मुलगा म्हणणे मुर्खपणा झाला असता कारण आहे तो पूर्ण मुलगा झाला होता. काय तो मूर्खपणाच झाला असता ना? आता सगळे आनंदाने राहू लागले.

समाप्त